धर्मादाय आयुक्त संघटनेच्या कार्यालयातील अभिलेख्यांच्या Scanning व Digitization चे काम निवडपात्र संस्थेला देणे व त्याकरीता प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र.सीएचसी १७२३/५६४/(प्र.क्र.१९४/२३)/का-१७**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दि. ०१ जुलै, २०२४.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय विधि व न्याय विभाग, क्र.LNJD/D१७०११/१०/Desk१७, दि.२१/०८/२०१४,
२) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र.पीआयसी-२०१९/प्र.क्र.५०/का-०७, दि.१२/०३/२०२०,
३) धर्मादाय आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.२५८६/२०२३/संगणक, दि.१९/०५/२०२३,
४) प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.१६/०२/२०२४ च्या बैठकीचे इतिवृत्त,
५) सेवापुरवठादार निवडीसाठी प्रधान सचिव व विधी परामर्शी यांच्या अध्यक्षतेखालील दि.०४/०६/२०२४ च्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

धर्मादाय संघटनेचे प्रशासन अधिक गतिमान व लोकाभिमुख करण्याच्यादृष्टीने ई-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्या अनुषंगाने संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये विधि व न्याय विभागांतर्गत प्रकल्प अंमलबजावणी समिती PIC (Project Implementation Committee) गठीत करण्यात आली आहे. संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये धर्मादाय संघटनेचे डिजीटायझेशन अंतर्गत संपूर्ण महाराष्ट्रात स्कॅनिंग व डिजिटायझेशनचे काम मे.कार्व्ही लिमिटेड यांना देण्यात आले होते. सदर सेवापुरवठादाराने सन २०१९ पर्यंत काम केले आहे. मे.कार्व्ही यांच्यासोबतचा करार संपुष्टात आल्यामुळे व मे.कार्व्ही लिमिटेड ही कंपनी अवसायानात गेल्यामुळे ८१,१९,२३४ पृष्ठांचे स्कॅनिंग करावयाचे बाकी आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र.४ च्या बैठकीमध्ये निर्णय घेण्यात आला की, केंद्र शासनाच्या माहिती व तंत्रज्ञान मंत्रालयाच्या अंतर्गत येणारी NICSI या कंपनीने निविदा प्रक्रीया राबवून तयार केलेल्या सेवा पुरवठादारांच्या पॅनेलमधून नविन पुरवठादार नेमता येईल. त्यानुसार संदर्भ क्र.५ च्या बैठकीमध्ये NICSI ने निविदा प्रक्रिया राबविलेल्या ३ सेवापुरवठादारांमधून एकाची म्हणजेच Enhira Software Export Ltd. या सेवापुरवठादाराची निवड करण्यात आली. त्यानुषंगाने उक्त कामकाज करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

धर्मादाय संघटनेचे मुख्यालय व त्यांच्या अधिनस्त असलेल्या कार्यालयामधील अभिलेख्यांचे Scanning व Digitization करण्यासाठी Enhira Software Export Ltd या सेवापुरवठादाराच्या निवडीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. NICSI च्या दर करारानुसार प्रत्येक प्रोफॉर्मा इन्व्हॉइससाठी नमूद केलेले दर खालीलप्रमाणे आहेत :-

| **अ.क्र.** | **प्रोफॉर्मा इन्व्हॉइस क्र.** | **स्थूल देय रक्कम** | **शेरा** |
|---|---|---|---|
| १. | PMIMH240261 Dated 07/05/2024 | रु.८,६६,२५,५७०/- (अक्षरी रुपये आठ कोटी सहासष्ट लाख पंचवीस हजार पाचशे सत्तर फक्त) | १८% सेवा कर व इतर भारांसहीत. |
| २. | PMIMH240259 Dated 07/05/2024 | रु.६,६०,५९,२३२/- (अक्षरी रुपये सहा कोटी साठ लाख एकोणसाठ हजार दोनशे बत्तीस फक्त) | १८% सेवा कर व इतर भारांसहीत. |
| ३. | एकूण | रु.१५,२६,८४,८०२/- (अक्षरी रुपये पंधरा कोटी सव्वीस लाख चौ-याऐंशी हजार आठशे दोन फक्त) | एकूण प्रकल्प खर्च. |

३. स्कॅनिंग कामाच्या निविदेत नमूद केल्यानुसार धर्मादाय संघटनेचे ई-गव्हर्नन्स अंतर्गत संपूर्ण महाराष्ट्रात स्कॅनिंग व डिजिटायझेशन करण्यासाठी एकूण रु.१५,२६,८४,८०२/- (अक्षरी रुपये पंधरा कोटी सव्वीस लाख चौ-याऐंशी हजार आठशे दोन फक्त) इतकी रक्कम, महाराष्ट्र विश्वस्त व्यवस्था अधिनियम, १९५० च्या कलम ६० मध्ये विहित केलेल्या अधिकारानुसार, सार्वजनिक न्यास प्रशासन निधीतून खर्च करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

४. सदर मंजुरी ज्या प्रयोजनासाठी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनासाठी रक्कम खर्ची टाकण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०७०११२२१४८२७१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANISHA ANIL KADAM

Digitally signed by MANISHA ANIL KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=6e49954abe1615213c9867d36416b4646311d3a20fa0e8638f40554d1f74d87b,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=46C6AAD763D6F6FE01CAEF299F7BF533D85983B1491695AAAE025643F38D12D4,
cn=MANISHA ANIL KADAM
Date: 2024.07.01 12:33:21 +05'30'

**( मनिषा कदम )**
**सहायक सॉलिसिटर नि उप सचिव**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत**:-

१) धर्मादाय आयुक्त, धर्मादाय आयुक्त कार्यालय, वरळी, मुंबई,
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता-१/२),महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३) महालेखापाल,(लेखापरिक्षा-१/२), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५) निवड नस्ती.